**आदिवासी क्षेत्र उपयोजनेखाली**
**अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी**
**निधी उपलब्ध करुन देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र.एबावि-२०११/प्र.क्र.२७०/का.६
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक :- २९ ऑक्टोंबर, २०११

**वाचा :-** आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र.१०/का.६, दिनांक २९.०४.२०११

**प्रस्तावना :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत मंजूर असलेल्या आदिवासी प्रकल्पांच्या नियंत्रणाखालील अंगणवाडी केंद्रांच्या इमारत बांधकामासाठी, आदिवासी क्षेत्र उपयोजनेखाली नवीन योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षापासून मान्य करण्यात आली आहे. त्याअंतर्गत सन २०११-१२ या आर्थिक वर्षात रु.३६.६३ कोटीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रु.१६.६३ कोटी इतकी तरतूद जिल्हास्तर योजनेकरिता आहे व उर्वरित रु.२०.०० कोटी इतकी तरतूद राज्यस्तरीय योजनेकरिता आहे. जिल्हास्तर योजनेची रु.१६.३३ कोटी इतकी तरतूद आदिवासी विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २९.०४.२०११ च्या शासन निर्णयानुसार वितरीत करण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय :-** आदिवासी क्षेत्र उपयोजनेअंतर्गत सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी राज्यस्तरीय योजनेसाठी रु.२०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे. सदरचा निधी खर्च करण्यासंबंधी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

(१) सदर निधी खालीलप्रमाणे जिल्हानिहाय वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नांव | आदिवासी क्षेत्र उपयोजनेखाली अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी मंजूर करण्यात आलेला निधी |
|---|---|---|
| १ | अहमदनगर | रु.३.१५ कोटी |
| २ | चंद्रपूर | रु.३.१५ कोटी |
| ३ | गोंदिया | रु.२.७० कोटी |
| ४ | जळगांव | रु.०.९० कोटी |
| ५ | नांदेड | रु.२.७० कोटी |
| ६ | पुणे | रु.१.८० कोटी |
| ७ | रायगड | रु.१.१० कोटी |
| ८ | ठाणे | रु.४.५० कोटी |
| | **एकूण** | **रु.२०.०० कोटी** |

(२) जिल्हानिहाय वितरीत करण्यात आलेल्या निधीतून **आदिवासी क्षेत्र उपयोजनेखाली असलेल्या गावांतील** ज्या अंगणवाडी केंद्रांना स्वतःच्या इमारती नाहीत, त्यांचेच इमारत बांधकाम हाती घेण्यात यावे.

(३) अंगणवाडी केंद्र इमारतीचे बांधकाम शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.एबावि-२००८/प्र.क्र.१७३/का.६, दिनांक १६.०९.२००९ मधील प्राथम्यक्रमाप्रमाणे

करण्यात यावे. या प्राथम्यक्रमांतर्गत बांधकाम करतांना ज्या अंगणवाडी केंद्रातील बालकांची संख्या जास्त असेल तेथील बांधकामांना प्राधान्य द्यावे.

(४) अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.एबाविं-२००८/प्र.क्र.१७३/का.६, दिनांक १५ जानेवारी, २०१० सोबतच्या नमुना आराखडाप्रमाणे (Type Plan) व एका इमारत बांधकामासाठी दिनांक २० एप्रिल, २०११ च्या शासन निर्णयानुसार रु.४.५० लाख या मर्यादेतच करण्यात यावा.

(५) या निधीतून बांधकाम झालेल्या इमारतींवर "आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील निधीतून बांधकाम" केल्याचे स्पष्टपणे नमूद करावे. तसेच इमारतीची मालकी "आदिवासी विकास विभाग" यांची राहील.

२. यासाठी होणारा खर्च - मागणी क्र.टी-५, २२३६ - पोषण आहार - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - पोषक अन्न व पेये वितरण - ७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२२३६१४१७) जिल्हा परिषदांना अंगणवाडी इमारतीच्या बांधकामासाठी अनुदाने, ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या निधीतून खर्च करुन त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यासाठी संबंधित जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना नियंत्रक अधिकारी व संबंधित जिल्हयाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, यांना आहरण, संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१११०२९१११२३४७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श. पा. वारे)
उप सचिव

प्रति,

१) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) आयुक्त, आदिवासी विकास, अहमदनगर/चंद्रपूर/गोंदिया/जळगांव/नांदेड/पुणे/रायगड/ठाणे
३) अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, अहमदनगर/चंद्रपूर/गोंदिया/जळगांव/नांदेड/पुणे/रायगड/ठाणे
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर
५) जिल्हाधिकारी,अहमदनगर/अमरावती/चंद्रपूर/धुळे/गडचिरोली/गोंदिया/जळगांव/नांदेड/नागपूर/नंदुरबार/नाशिक/पुणे/रायगड/ठाणे/यवतमाळ
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,अहमदनगर/अमरावती/चंद्रपूर/धुळे/गडचिरोली/गोंदिया/जळगांव/नांदेड/नागपूर/नंदुरबार/ नाशिक/पुणे/रायगड/ठाणे/यवतमाळ
७) वित्त विभाग (अर्थसंकल्प)
८) नियोजन विभाग
९) आदिवासी विकास विभाग, कार्या.६ व कार्या.८, मंत्रालय, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/चंद्रपूर/गोंदिया/जळगांव/नांदेड/पुणे/रायगड/ठाणे
११) महिला व बाल विकास विभाग, कार्या.४ (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती (कार्या.६)